सन २०१७-१८ या आर्थिक वर्षासाठी सर्व शिक्षा अभियान कार्यक्रमासाठी निधी (आदिवासी उपयोजना हिस्सा) वितरीत करणेबाबत (केंद्र व राज्य हिस्सा).

# महाराष्ट्र शासन
## शालेय शिक्षण व क्रीडा विभाग
### शासन निर्णय क्रमांकः एसएसए-२०१७/प्र.क्र.११०भाग-३/एस.डी-१

मादाम कामा मार्ग हुतात्मा राजगुरु चौक
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
दिनांक: २० जून, २०१७

वाचा -

१) शालेय शिक्षण विभाग, शासन निर्णय क्रमांक पीआरई-२०००/(२७४०)/प्राशि-१, दि. १८/०१/२००२

२) शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र.संकीर्ण-२०१५/प्र.क्र.३४/कोषा प्रशा-५, दि. २४/०७/२०१५

३) शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र.अर्थस-२०१७/प्र.क्र.७५/अर्थ-३, दि. १८/०४/२०१७

४) केंद्र शासन, मनुष्यबळ विकास मंत्रालय, नवी दिल्ली आदेश क्रमांक : F.No ४-२/२०१७ - EE.८ (III), दि.२५/०४/२०१७ व F.No-४-२/२०१७-EE.८ (VI), दि.२५/०४/२०१७

५) आदिवासी विकास विभाग, शासन निर्णय, क्रमांक- बीयुडी-२०१७/प्र.क्र.०२/कार्यासन-६, दिनांक १६/०६/२०१७

प्रस्तावना-

सर्व शिक्षा अभियान योजनेसाठी केंद्र व राज्य शासनाच्या हिस्स्याचे प्रमाण (केंद्र : राज्य) ६०:४० असे आहे. केंद्र शासनाने दिनांक २५/०४/२०१७ च्या आदेशान्वये केंद्र शासनाच्या हिस्स्याचा ad hoc आदिवासी उप योजनेचा निधी (TSP) रु.३६,०६,३८,०००/- (रुपये छत्तीस कोटी सहा लाख अडतीस हजार फक्त) इतका निधी राज्याच्या एकत्रित निधीत जमा केलेला आहे. सदर निधी राज्याच्या एकत्रित निधीत जमा झाल्याचे वित्त विभागाच्या अर्थोपाय शाखेने अनौपचारिक संदर्भ क्र. २३२/अर्थोपाय, दि.१६/०५/२०१७ अन्वये अभिप्राय दिले आहेत. सदर निधीच्या प्रमाणात राज्य हिस्सा रु.२४,०४,२५,३३४/- (रुपये चोवीस कोटी चार लाख पंचवीस हजार तीनशे चौतीस फक्त) इतका येतो. केंद्र शासनाकडून प्राप्त झालेला केंद्र हिस्स्याचा निधी (आदिवासी उप योजनेचा निधी) रु.३६,०६,३८,०००/- (रुपये छत्तीस कोटी सहा लाख अडतीस हजार फक्त) व त्याप्रमाणात राज्य हिस्सा (आदिवासी उप योजनेचा निधी) रु.२४,०४,२५,३३४/- (रुपये चोवीस कोटी चार लाख पंचवीस हजार तीनशे चौतीस फक्त) असा एकूण रु.६०,१०,६३,३३४/- (रुपये साठ कोटी दहा लाख त्रेसस्ट हजार तीनशे चौतीस फक्त) निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. याबाबतचा शासन निर्णय खालीलप्रमाणे आहे.

शासन निर्णय-

सर्व शिक्षा अभियान या केंद्र पुरस्कृत योजनेंतर्गत सन २०१७-१८ या वित्तीय वर्षाकरिता मागणी क्र.टी-५, २२०२, सर्वसाधारण शिक्षण, पंचवार्षिक योजनांतर्गत योजना, ०१, प्राथमिक शिक्षण, ७९६

जनजाति क्षेत्र उपयोजनाए (०१) जनजाति क्षेत्र उपयोजनांतर्गत योजना राज्य योजनांतर्गत योजना, (०१) (०६) सर्व शिक्षा अभियान योजना (६० टक्के केंद्र हिस्सा) लेखाशिर्ष (२२०२ आय ४४१), ३१ सहायक अनुदाने (वेतनेत्तर) करिता एकूण रु.९८००.०० लाख तरतूद अर्थसंकल्पित आहे. तर त्यास समवर्ती राज्य हिस्सा म्हणून (०१) (०७) सर्व शिक्षा अभियान योजना (४० टक्के राज्य हिस्सा) लेखाशिर्ष (२२०२ आय ४५२) ३१-सहायक अनुदाने (वेतनेत्तर) करिता एकूण रु.६६००.०० लाख तरतूद अर्थसंकल्पित आहे.

२. केंद्र शासनाने सर्व शिक्षा अभियान योजनेकरिता उपलब्ध करुन दिलेला केंद्र हिस्स्याचा निधी (आदिवासी उप योजना) रु.३६,०६,३८,०००/- (रुपये छत्तीस कोटी सहा लाख अडतीस हजार फक्त) व त्याप्रमाणात राज्य हिस्सा (आदिवासी उप योजना) रु.२४,०४,२५,३३४/- (रुपये चोवीस कोटी चार लाख पंचवीस हजार तीनशे चौतीस फक्त) असा एकूण रु.६०,१०,६३,३३४/- (रुपये साठ कोटी दहा लाख त्रेसस्ट हजार तीनशे चौतीस फक्त) इतका निधी महाराष्ट्र प्राथमिक शिक्षण परिषद, मुंबई यांच्याकडे सर्व शिक्षा अभियान कार्यक्रमाच्या अंमलबजावणीसाठी या आदेशान्वये वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

वरीलप्रमाणे वितरीत करण्यात आलेला निधीचा खर्च "मागणी क्र.टी-५, २२०२, सर्वसाधारण शिक्षण, पंचवार्षिक योजनांतर्गत योजना, ०१, प्राथमिक शिक्षण, ७९६ जनजाति क्षेत्र उपयोजनाए (०१) जनजाति क्षेत्र उपयोजनांतर्गत योजना राज्य योजनांतर्गत योजना, (०१) (०६) सर्व शिक्षा अभियान योजना (६० टक्के केंद्र हिस्सा) (२२०२ आय ४४१) ३१ सहायक अनुदाने (वेतनेत्तर) व (०१) (०७) सर्व शिक्षा अभियान योजना (४० टक्के राज्य हिस्सा) लेखाशिर्ष (२२०२ आय ४५२) ३१-सहायक अनुदाने (वेतनेत्तर)" या लेखाशिर्षांतर्गत सन २०१७-१८ या वर्षाच्या उपलब्ध तरतूदीतून भागविण्यात यावा.

३. वित्त विभागाच्या दि.२४/०७/२०१५ च्या शासन परिपत्रकानुसार खालील बाबी नमूद करण्यात येत आहेत.

३.१) वित्त विभागाच्या दि. १८/०४/२०१७ च्या शासन परिपत्रकान्वये निधी वितरणाचे अधिकार विभागास आहेत.

३.२) यापूर्वी वितरीत केलेल्या अनुदानापैकी ७५% पेक्षा अधिक खर्च झाला आहे.

३.३) ज्या लेखाशिर्षाखाली अनुदान वितरीत करण्यात येत आहे त्या लेखाशिर्षांतर्गत १ वर्षापूर्वीचे संक्षिप्त देयक प्रलंबित नाही.

३.४) दि. २४/०७/२०१५ च्या आदेशातील **अ** मधील इतर मुद्यांची पूर्तता होत आहे.

४. सदर शासन निर्णयान्वये वितरित केलेला निधी उपरोक्त संदर्भाधीन केंद्र शासनाचे दि.२५/०४/२०१७ रोजीच्या आदेशामध्ये दिलेल्या निदेशानुसार खर्च करावा. तसेच आदिवासी क्षेत्रामध्ये व आदिवासी लाभार्थ्यांकरिताच खर्च करण्यात यावा.

५. सदर खर्च वित्त विभागाच्या संदर्भाधिन दि. १८/०४/२०१७ व दि.२४/०७/२०१५ च्या शासन परिपत्रकातील सूचनांनुसार करण्यात यावा. सदर निधी आहरीत करुन वितरीत करण्यासाठी अवर सचिव / कक्ष अधिकारी (रोख शाखा), शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, यांना "आहरण व संवितरण अधिकारी" तर उप सचिव (प्रशासन), शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय यांना "नियंत्रक अधिकारी" म्हणून घोषित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या संदर्भाधिन दि. १८/०४/२०१७ च्या शासन परिपत्रकान्वये, वित्त विभागाच्या अर्थोपाय शाखेने अनौपचारिक संदर्भ क्र. २३२/अर्थोपाय, दि.१६/०५/२०१७ अन्वये व आदिवासी विकास विभागाच्या संदर्भाधिन दिनांक १६/०६/२०१७ रोजीच्या शासन निर्णयान्वये दिलेल्या मान्यतेस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

७. वित्त विभागाच्या दि.१८/०४/२०१७ रोजीच्या परिपत्रकाच्या परिच्छेद अनुक्रमांक ७ ते १८ मधील अटींची तसेच परिपत्रकाच्या परिशिष्टातील अनुक्रमांक ८ मधील १ ते ९ मध्ये नमूद अटींची पूर्तता होत आहे. सदर परिपत्रकाच्या परिशिष्टातील १० मधील बाब या आदेशासाठी लागू नाही.

८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१७०६२०११३८३०६३२१ असा आहे. सदर शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Suvarna S Kharat

Digitally signed by Suvarna S Kharat
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=School And Education Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=8a98fe3e5a45c818668168cffd366aced9a44c59607f616a36d403a80e74d0df, cn=Suvarna S Kharat
Date: 2017.06.20 11:45:56 +05'30'

**(डॉ. सुवर्णा खरात)**
सह सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१) मा. राज्यपालांचे सचिव, राजभवन, मुंबई
२) मा.मंत्री, शालेय शिक्षण यांचे खाजगी सचिव
३) मा. प्रधान सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई
४) आयुक्त (शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे
५) राज्य प्रकल्प संचालक, महाराष्ट्र प्राथमिक शिक्षण परिषद, चर्नीरोड, मुंबई
६) महालेखापाल (लेखा परीक्षा), महाराष्ट्र १/२ मुंबई, नागपूर
७) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई / नागपूर
८) संचालक, लेखा व कोषागारे, महाराष्ट्र राज्य, मुंबई - ६३
९) सर्व वरिष्ठ लेखा परीक्षक (शिक्षण विभाग)
१०) अधिदान व लेखा कार्यालय, मुंबई
११) वित्त विभाग, (व्यय-५ / अर्थसंकल्प शाखा), मंत्रालय, मुंबई
१२) अवर सचिव / कक्ष अधिकारी, रोख शाखा / अर्थसंकल्प, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग , मंत्रालय, मुंबई
१३) निवड नस्ती (एस.डी.१)